अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक, गट-अ” (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

### शासन आदेश क्रमांकः पदोनि-१०१६/प्र.क्र. ४९/का-१४२७

मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २० फेब्रुवारी, २०१७

संदर्भ :- शासनाचे समक्रमांक दिनांक ९.०६.२०१६ रोजीचे आदेश.

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चे कलम ४ (४) मधील तरतुदीनुसार, अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक, गट-“अ” (राजपत्रित) (रुपये १५६००-३९१०० अधिक ग्रेड वेतन ६६००) या संवर्गातील श्री. सं. ल. पाटील, सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई व श्रीमती सु. सु. अय्यर, सहसंचालक (पत व पध्दती), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांची सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने संदर्भाधीन आदेशातील सदरहू पदस्थापनेत बदल करण्यात येत असून, त्यांची पदस्थापना स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव, दिनांक ९.०६.२०१६ च्या आदेशान्वये देण्यात आलेल्या पदस्थापनेचे पदनाम व कार्यालय | सद्य:स्थितीत कार्यरत असलेले पदनाम व कार्यालयाचे नाव | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री. सं. ल. पाटील, सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई | सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई | सहसंचालक (पत व पध्दती) , नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई |
| १ | श्रीमती सु. सु. अय्यर, सहसंचालक (पत व पध्दती), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | सहसंचालक (पत व पध्दती), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई |

२. श्री. सं. ल. पाटील, सहसंचालक व श्रीमती सु. सु. अय्यर, सहसंचालक यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.

३. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची कार्यवाही सात दिवसांच्या आत करावी. अद्ययावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिकाऱ्याच्या त्या महिन्याच्या वेतन देयकासोबत कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक कोषागार कार्यालयाने पारित करु

नये. तसेच, अद्ययावत ई-प्रोफाईलच्या प्रती संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई व शासनास पाठविण्यात याव्यात. ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयप्रमुखांची राहील.

४. संबंधित कार्यालयप्रमुखांनी बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास कार्यमुक्त केल्याबाबतच्या व रुजू करुन घेतल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२०१५०२३७०९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae443 59c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2017.02.20 15:29:42 +05'30'

**( प्रियांका छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा),महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपूर.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (नियोजन)/मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवी मुंबई/ पुणे/ नाशिक / औरंगाबाद / अमरावती /नागपूर.
६. उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग / नवी मुंबई /पुणे /नाशिक / औरंगाबाद / अमरावती /नागपूर.
७. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
८. अवर सचिव,सामान्य प्रशासन विभाग (का.१२/का.१६ ब), मंत्रालय,मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१०. लेखा अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई/लेखाकोष भवन, वांद्रे (पू.) मुंबई- ५१.
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३. सर्व संबंधित अधिकारी (अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत).
१४. निवड नस्ती.